# महाराष्ट्र शासन

क्र. संकिर्ण १०१७/प्र.क्र.९३/१३-स
सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २३ ऑगस्ट, २०१७

परिपत्रक:-

सहकार क्षेत्रातील कार्यरत संस्थांपैकी काही संस्था विविध कारणांमुळे आर्थिक अडचणीत आल्या असून, याचा राज्याच्या सहकार चळवळीवर अनिष्ट परिणाम झाल्याचे दिसून आले आहे. राज्याची सहकार चळवळ अधिक समृध्द करण्यासाठी अशा कमकुवत सहकारी संस्थांचे बळकटीकरण करण्यासाठी विशेष प्रयत्न करणे गरजेचे आहे. सहकाराच्या सात मुलभूत तत्वांपैकी "सहकारांतर्गत सहकार" या तत्वानुसार सक्षम सहकारी संस्थांनी कमकुवत सहकारी संस्थांच्या बळकटीकरणासाठी पुढाकार घेण्याची आवश्यकता आहे. ही बाब विचारात घेता, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ६९ मधील तरतूदीन्वये सहकार क्षेत्रातील आर्थिकदृष्ट्या सक्षम सहकारी संस्थांनी सामाजिक बांधिलकीच्या भूमिकेतून विविध सहकारी व सार्वजनिक प्रयोजनासाठी अंशदान उपलब्ध करणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत -

**अ) मार्गदर्शक सुचना:-**

१) **दुष्काळ प्रतिबंधक व दुष्काळ निवारणार्थ सार्वजनिक स्वरूपाची उपक्रमासाठी आर्थिक मदत** :- जलयुक्त शिवार या अभियानासाठी आर्थिक मदत (ग्रामीण भागातील नाला / नदी रुंदीकरण व खोलीकरण करणे, धरणे / तलाव यामधील गाळ काढणे), मूळ स्थळी जलसंधारण, जनावरांसाठी चारा छावणीला आर्थिक मदत, टंचाईसदृश्य परिस्थितीत ग्रामीण भागातील गावांना भाड्याने टँकरद्वारे पाणी पुरवठा, विंधण विहीर खोदणे, पाण्याची टाकी पुरविणे इ.

२) **नैसर्गिक आपत्ती** :- भूकंप, अतिवृष्टी, महापूर, चक्रीवादळ, रोगराई अशा नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित झालेल्या गावांना / गावातील कुटुंबांना आर्थिक मदत.

३) **पर्यावरण** :- वृक्ष लागवड व संवर्धन, परिसर स्वच्छता, शौचालय उभारणी,निर्धूर चुली/सौर.

४) **आरोग्य** :- धर्मादाय संस्थांनी / सहकारी संस्थांनी चालविलेल्या रुग्णालयांना वैद्यकिय उपकरणे व यंत्रसामुग्री इ. सुविधा पुरविणे दारिद्रय रेषेखालील गरजू / गरीब रुग्णांच्या दुर्धर आजारांच्या उपचारासाठी / शस्त्रक्रियेसाठी आर्थिक मदत, दिव्यांग व्यक्तीच्या उपयोगी साहित्य पुरविणे, मा. मुख्यमंत्री वैद्यकिय सहाय्यता निधीसाठी मदत, सार्वजनिक आरोग्य तपासणी शिबिरासाठी आर्थिक मदत, रक्तदान शिबिरासाठी आर्थिक मदत.

५) **शिक्षण** :- शहरी / ग्रामीण भागातील शाळांमध्ये शिकणाऱ्या गरजू विद्यार्थ्यांना शालोपयोगी साहित्य, गणवेश पुरविणे, संगणक साक्षरतेच्या दृष्टीने शाळांना संगणक, प्रोजेक्टर,स्क्रीन, इंटरनेट इ. सुविधा पुरविणे.

६) **क्रिडा:-**खेळाच्या मैदानांची देखभाल, खेळाचे साहित्य पुरविणे, क्रिडा प्रकारातील कबड्डी, खो-खो हॉली बॉल, बास्केट बॉल इत्यादी खेळासाठी जिल्हा व राज्यस्तरिय चमुना प्रोत्साहन देणे, योगा व प्राणायाम यासाठी आवश्यक ती मदत करणे.

७) **कृषी :-** कृषी प्रदर्शनाच्या आयोजनासाठी आर्थिक मदत तसेच शेतक-यांसाठी प्रशिक्षण शिबिराचे आयोजन.

८) **महिला सबलीकरण :-** महिला बचत गटांना लघु उद्योग / व्यवसायांसाठी प्रशिक्षण व आर्थिक मदत.

९) **सहकार :- कमकुवत सहकारी संस्थांच्या बळकटीकरणांसाठी आर्थिक मदत -**

अ) **प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण -** या संस्थांचे पदाधिकारी व कर्मचारी यांना संस्थेच्या उत्कृष्ट व्यवस्थापन पध्दतीचे प्रशिक्षण, कर्मचाऱ्यांना संगणकीकरणाचे प्रशिक्षण, प्रशिक्षित मनुष्यबळ असलेल्या संस्थांना संगणक पुरविणे. संस्थेच्या व्यवसाय वाढीसाठी प्रशिक्षण व आर्थिक मदत.

ब) **कृषी पणन व कृषी प्रक्रिया संस्थांना आर्थिक मदत -** या संस्थांच्या यंत्रसामुग्रीचे आधुनिकीकरण, शेतमालाच्या मूल्य वृध्दीसाठी आधुनिक तंत्रज्ञानाचा अवलंब. (आर्थिक मदतीची कमाल मर्यादा प्रकल्प किंमतीच्या २५%)

उपरोक्त मार्गदर्शन सुचनांचे पालन करतांना खालील नमूद अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी:-

**ब) अटी व शर्ती:-**

१) गृहनिर्माण सहकारी संस्था वगळून सर्व व्यावसायिक सहकारी संस्थांनी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ६९ मधील तरतूदीनुसार आर्थिक वर्षात होणाऱ्या निव्वळ नफ्यातून २०% पर्यत वरील कारणासाठी सार्वजनिक प्रयोजनासाठी अंशदान / देणगी स्वरुपात आर्थिक मदत करावी. सदर निव्वळ नफ्याची रक्कम संबंधित लेखापरिक्षकाने प्रमाणित करणे आवश्यक आहे.

२) सहकारी संस्थेने सार्वजनिक प्रयोजनासाठीच्या अशंदानाचा विनियोग महाराष्ट्र राज्य सहकारी संघ मर्या. पुणे यांच्या पूर्वपरवानगीने करणे आवश्यक आहे.

३) कलम ६९ मधील तरतूदीनुसार त्यांच्या नफ्यातून सहकारी, धर्मादाय किंवा सार्वजनिक प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करणाऱ्या संस्थांना सहकार पुरस्काराच्या मूल्यमापनासाठी विशेष गुण देण्यात येतील.

४) सदर निधीचा विनियोग कोणत्याही धर्माच्या प्रचारासाठी अथवा प्रसारासाठी करता येणार नाही. तसेच धार्मिक संस्थेच्या प्रांगणामध्ये किंवा आवारामध्ये आणि धार्मिक संस्थांनी आयोजित कार्यक्रमासाठी सदर निधी वापरता येणार नाही.

५) संस्थेचा व्यवसाय वाढविण्याव्यतिरिक्त पदाधिका-यांचे वाढदिवस अथवा संबंधित इतर कार्यक्रमासाठीच्या जाहीरातीसाठी सदर निधी वापरता येणार नाही.

६) निवडणूक आचार संहितेच्या कालावधीत आचारसंहितेचा भंग होईल अशा कार्यक्रमासाठी सदर निधी अनुज्ञेय राहाणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१७०८२३१७४०१५९६०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Jayaram Choudhary

Digitally signed by Anil Jayaram Choudhary
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Anil Jayaram Choudhary
Date: 2017.08.23 18:02:42 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य पुणे.

३. आयुक्त, दुग्ध विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
७. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ मर्या. पुणे.
९. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१०. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. विरोधी पक्ष नेता दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई.
५. सर्व विधासभा/विधानपरिषद सदस्य.
६. मुख्यसचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (पणन), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (१३-स)